सुधारित वेतनश्रेणीच्या कमाल वेतनावर कुंठीत झालेल्या शासकीय कर्मचा-यांना कुंठीत वेतनवाढी मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:वेतन-1099/प्र.क्र.1/99/सेवा-3,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 25 जानेवारी, 1999.

वाचा :- (1) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर-1288/579/सेवा-10, दिनांक 14 ऑक्टोबर, 1988.
(2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन-1090/प्र.क्र.22/94/सेवा-3, दिनांक 12 सप्टेंबर, 1994.
(3) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन-1094/प्र.क्र.22/सेवा-3, दिनांक 25 ऑक्टोबर, 1997.
(4) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागचे कार्यालयीन ज्ञापन क्रमांक : 1(9)/ई-III-अ/97, दिनांक 22 जुलै, 1998.

## शासन निर्णय

पाचव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने उपरोल्लिखित दिनांक 22 जुलै 1998 च्या आदेशान्वये जे केंद्र शासकीय कर्मचारी रुपये 22,400 पेक्षा अधिक कमाल वेतन नसलेल्या त्यांच्या पदांच्या सुधारित वेतनश्रेणीत कुंठीत झाले असतील त्यांना कुंठीत वेतनवाढी मंजूर करण्यात आल्या आहेत.

2. राज्य शासकीय कर्मचा-यांना अशा कुंठीत वेतनवाढीचा लाभ देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन असे आदेश देत आहे की, जे राज्य शासकीय कर्मचारी महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, 1998 खाली सुधारित वेतनश्रेणीची निवड करतील आणि ज्यांच्या वेतनश्रेणींची कमाल मर्यादा रुपये 22,400 पेक्षा अधिक नसेल आणि जे सुधारित वेतनश्रेणींच्या कमाल टप्प्यावर पोहोचतील त्यांना त्यांच्या वेतनश्रेणीच्या कमाल टप्प्यावर दर दोन वर्षे पूर्ण झाल्यावर एक कुंठीत वेतनवाढ मंजूर करावी. ही वेतनवाढ वेतनश्रेणीमध्ये घेतलेल्या शेवटच्या वेतनवाढीच्या दराच्या समतुल्य असेल. अशा कमाल तीन वेतनवाढी देण्यात येतील.

3. ज्या शासकीय कर्मचा-यांचे वेतन संबंधित सुधारित वेतनश्रेणीत दिनांक 1.1.1996 रोजी कमाल वेतनावर निश्चित होईल अशा कर्मचा-यांना दिनांक 1 जानेवारी 1996 पासून गणण्यात यावयाचा दोन वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यावर कुंठीत वेतनवाढ अनुज्ञेय होईल. म्हणजेच, दिनांक 1.1.1998 पूर्वी कोणताही शासकीय कर्मचारी पहिली कुंठीत वेतनवाढ मिळण्यास पात्र होणार नाही. त्याचप्रमाणे असुधारित वेतनश्रेणीत जर काही कुंठीत वेतनवाढी या आधीच प्राप्त झाल्या असतील तर त्या सुधारित वेतनश्रेणीत अनुज्ञेय होणा-या तीन कमाल वेतनवाढीसाठी जमेस धरण्यात येऊ नयेत.

4. सदर कुंठीत वेतनवाढी पदोन्नतीच्या पदावरील वेतननिश्चितीसह महागाई भत्ता, घरभाडे भत्ता, स्थानिक पूरक भत्ता, निवृत्तीवेतनविषयक लाभ इत्यादी सर्व प्रयोजनार्थ विचारात घेण्यात याव्यात.

5. हे आदेश दिनांक 1 जानेवारी 1996 पासून अंमलात येतील.

6. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे अपर मुख्य सचिव/उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, (व्यय विभाग),
खोली क्रमांक 261, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-3.

---

* पत्राद्वारे

---

एच-1181(14,000+40-2-99)13.